जिल्हा व सत्र न्यायालय सांगली, जिल्हा सांगली यांचे नवीन इमारतीकरीता निर्माण करण्यात आलेली १२ उद्वाहनचालक व ३ बागकामगार यांची काल्पनिक पदे बाह्ययंत्रणेद्वारे उपलब्ध होईपर्यंत करार पद्धतीने कंत्राटी तत्वावर भरणेबाबत .....

# महाराष्ट्र शासन
## विधि व न्याय विभाग
### शासन निर्णय क्रमांकः कंत्राटी २०१८/प्र.क्र.२८/का.१२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १५ जून, २०१८

**वाचा -**

१ शासन निर्णय , विधि व न्याय विभाग क्रमांकः कंत्राटी २०१८/प्र.क्र.२८/का.१२, दिनांक ३१ मे, २०१८

२ जिल्हा व सत्र न्यायालय सांगली यांचे पत्र क्रमांक जा.क्र.२०१९/२०१८, दिनांक ०५.०३.२०१८

**प्रस्तावना-**

उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र. (१) येथील शासन निर्णयान्वये जिल्हा व सत्र न्यायालय सांगली, जिल्हा सांगली येथील नवीन इमारतीकरीता १२ उद्वाहनचालक व ३ बागकामगार यांची काल्पनिक पदे निर्माण करण्यास व त्यांच्या सेवा बाह्ययंत्रणेद्वारे कंत्राटी तत्वावर उपलब्ध करुन घेण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार कार्यवाही करण्यास दोन तीन महिने इतका कालावधी लागण्याची शक्यता आहे. परंतु नवीन इमारतीमध्ये न्यायालय सुरु आहे. वृद्ध पक्षकार, महिला, बालक, न्यायाधिश व वकील मंडळी यांना यामुळे गैरसोय होऊ नये म्हणून सदर पदांसाठी बाह्ययंत्रणेद्वारे कंत्राट अस्तित्वात येईपर्यंत किंवा ३ महिने यापैकी कमी असलेल्या कालावधीसाठी प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश सांगली यांचे स्तरावर करार पद्धतीने नियुक्त्या करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

जिल्हा न्यायालय सांगली येथील नवीन न्यायालयीन इमारतीमध्ये बाह्ययंत्रणेद्वारे १२ उद्वाहनचालक व ३ बागकामगार यांच्या कामाचे कंत्राट अस्तित्वात येईपर्यंत किंवा ३ महिने यापैकी कमी असलेल्या कालावधीसाठी प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश सांगली यांचे स्तरावर करार पद्धतीने नियुक्त्या करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. या नियुक्त्या करताना खालील अटींचे पालन करण्यात यावे.

(१) स्थानिक वृत्तपत्रात जाहीरात देऊन पारदर्शक पद्धतीने बाह्ययंत्रणेद्वारे पदे उपलब्ध होईपर्यंत किंवा ३ महिने यापैकी किमान कालावधीकरीता ही पदे भरण्यात यावीत.

(२) ३ महिन्यांचा कालावधी संपुष्टात येताच, नियुक्ती आदेश आपोआप संपुष्टात येतील. सदर पदावर केलेल्या सेवेमुळे संबंधित पदावर किंवा अन्य कोणत्याही पदावर नियुक्ती मिळण्याचा / समायोजनाचा हक्क संबंधितांना प्राप्त होणार नाही, ही बाब नियुक्ती आदेशात स्पष्ट करण्यात यावी.

(३) सदर उमेदवारांच्या नियुक्त्या संपुष्टात आणल्याबाबतचा अहवाल शासनास सादर करणे आवश्यक राहील.

(४) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग दिनांक २७.०१.२०१५, २३.०२.२०१७ व ०९.०८.२०१७ मधील तरतुदींच्या अधीन राहून ३ महिन्यांच्या आत किमान कालावधीची निविदा प्रक्रीया राबवून या पदांचे काम बाह्ययंत्रणेद्वारे करुन घेणे बंधनकारक राहील.

(५) आवश्यकतेनुसार उद्वाहनांच्या संख्येच्या मर्यादेत कमाल १२ इतक्या उद्वाहनचालकांची नियुक्ती करण्यात यावी.

२. यासाठीचा खर्च मागणी क्रमांक जे-१, २०१४-न्यायदान, (००) १०५ दिवाणी व सत्र न्यायालये, (०२) जिल्हा व सत्र न्यायाधिश, (०२) मजुरी (२०१४ ०१७२ ०२) दत्तमत, या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१५१२५२४०९४१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Amogh
Shyamkant Kaloti

Digitally signed by Amogh Shyamkant Kaloti
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1f733daf00a6028414c43d0cc10d82acab3b732c4edd56e818f8a3b355588753, serialNumber=9ebeebf21dc54ceec51e6d5ffc84bb94ca6af89497279007d66e97dc13547037, cn=Amogh Shyamkant Kaloti
Date: 2018.06.15 12:55:07 +05'30'

**( अ. श्यां. कलोती )**
विधि सल्लागार नि सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधानमंडळ सचिवालय,
२. मा.विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र
३. प्रबंधक (निरीक्षणे -१/२), मा.उच्च न्यायालय मुंबई
४. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, सांगली,

५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई, नागपूर

६. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर,

७. जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली

८. उप जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली

९. सामान्य प्रशासन विभाग (का.१३)

१०.वित्त विभाग, व्यय-५ / आ.पु.क,

११.विधि व न्याय विभाग, का.७, ११, १३, २३ व २४

१२.निवडनस्ती (का.१२)